**ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक, क्रमांक विसआ-२०११/प्र.क्र.१०९/पापु-०७**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : २९ जुलै, २०११**

**प्रस्तावना :**

विधानमंडळाच्या सन २०१० अर्थसंकल्पिय अधिवेशनामध्ये, लक्षवेधी सूचनेला उत्तर देताना मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांनी ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीमध्ये सुरळीतपणा आणण्यासाठी, त्यांना तांत्रिक मार्गदर्शन करण्यासाठी सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांची बैठक बोलाविण्यात येईल असे आश्वासन दिले होते. त्याअनुषंगाने ही बैठक दि. २० जून, २०११ रोजी दुपारी ३.०० वाजता, यशदा पुणे येथे आयोजित करण्यात आली होती.

२. या बैठकीमध्ये मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांनी दिलेल्या सूचना / निर्देश सर्व क्षेत्रीय अधिका-यांना कळविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :**

राज्याच्या ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता कार्यक्रमाच्या परिणामकारक अंमलबजावणीसाठी, राज्याच्या सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना मार्गदर्शन करण्यासाठी, मा. मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांनी दि. २० जून, २०११ रोजी यशदा पुणे येथे आयोजित केलेल्या बैठकीमध्ये, मा.मंत्री महोदयांनी दिलेल्या निर्देशांचे अनुषंगाने पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१. ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची कामे वेळेत पूर्ण करण्यासाठी, जनतेचे सहकार्य आवश्यक आहे, त्यासाठी ग्रामीण भागातील जनतेची लोकजागृती त्यांना समजेल अशा सोप्या भाषेमध्ये करण्यासाठीचे कार्यक्रम आखावेत व त्यांची तातडीने अंमलबजावणी करावी.

२. गावामध्ये पाणी पुरवठा योजना घेण्यासाठी, गाव / वाडी / वस्ती ६० टक्के हागंदारीमुक्त असणे, गरजेचे आहे. अनेक टंचाईग्रस्त गावे, त्याचप्रमाणे स्रोत प्रदुषित असलेली गावे केवळ, गाव ६० टक्के हागंदारी मुक्त नसल्याने, गावामध्ये पाणी पुरवठा योजना घेऊ शकत नाहीत. अशा गावे / वाड्या / वस्त्यांची माहिती, कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग यांनी, जिल्हा संपूर्ण स्वच्छता कक्षाला उपल्बध करून देऊन, या गावे / वाड्या, तातडीने हागंदारीमुक्त करण्यासाठी या कक्षाने आपली शक्ती प्राथम्याने वापरावी. त्यासाठी, लोकजागृतीसह आवश्यक त्या सर्व उपाययोजना घ्याव्यात.

३. ज्या ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे स्त्रोत विहिरी आहेत, अशा ठिकाणी विहिरींची कामे ऑक्टोबर पर्यंत पूर्ण होतील व योजनेची उर्वरित कामे १ वर्षात पूर्ण होतील, याची काळजी घेण्यात यावी.

४. योजनेच्या अंमलबजावणीमध्ये अपहार अथवा भ्रष्टाचार झाल्याचे निदर्शनास आल्यास, संबंधितांविरुद्ध तात्काळ FIR नोंदविण्याची कार्यवाही करण्यात यावी.

५. योजनांच्या कामांची आखणी करताना, ग्रामपंचायतींकडून सादर झालेल्या योजनांच्या प्रस्तावांची तपसणी करताना, प्रस्ताव तांत्रिक दृष्ट्या काटेकोर रितीने तपासण्यात यावेत, गावातील उपलब्ध या पुर्वीच्या योजनांच्या मालमत्तेचा पुरेपूर वापर करण्यात येत आहे, याची खातरजमा करण्यात यावी, त्याचप्रमाणे योजनांची बांधकामे गुणवत्ता पुर्वक होत आहेत, याची प्रत्यक्ष तपासणी जिल्हा परिषदेच्या ग्रामीण पाणी पुरवठा विभागाने करावी. यासाठी संबंधित समित्यांना जिल्हा परिषदेच्या ग्रामीण पाणी पुरवठा विभागाने तसेच आवश्यक तेथे महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या अभियंत्यांना तांत्रिक दृष्ट्या सर्वतोपरी मार्गदर्शन करावे.

६. दि.१७ मार्च,२०१० च्या शासन निर्णयामध्ये उल्लेखिल्यानुसार, योजनांची अंमलबजावणी करताना, उद्‌भवाची कामे पूर्ण झाल्याशिवाय व तो यशस्वी असल्याचे प्रमाणपत्र घेतल्याशिवाय योजनेची पुढील कामांचे अनुषंगाने, कोणत्याही वस्तुंची खरेदी किंवा कामांना सुरवात करण्यात येऊ नये.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेब साईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक **२०११०७२९११२३०६००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सही /-**

(र. अं. खडसे)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

*प्रत,*

*मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता ) यांचे खाजगी सचिव,*
*मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव*
*विभागीय आयुक्त (सर्व)*
*आयुक्त, महानगरपालिका (सर्व)*
*सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई*
*संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे*
*सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद*
*मुख्याधिकारी (सर्व नगर पालिका) (अ, ब व क वर्ग)*
*सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,*
*सर्व अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद*
*सर्व कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग*
*महालेखापाल, महाराष्ट्र - १, मुंबई (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)*
*महालेखापाल, महाराष्ट्र - २, नागपूर (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)*
*मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नवी मुंबई*
*उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,नाशिक, पुणे,औरंगाबाद, अमरावती व नागपूर*
*सर्व प्रादेशिक उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा*
*सर्व प्रादेशिक मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण*
*सर्व जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा*
*सर्व गट विकास अधिकारी, पंचायत समिती*
*नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई*
*वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,*
*ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई*
*मंत्रालयातील इतर सर्व विभाग,*
*पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी व कार्यासने*
*निवडनस्ती, कार्यासन क्रमांक पापु-०७*